महाराष्ट्र राज्य विवाद धोरणानुसार विभागस्तरीय अधिकार समिती गठीत करण्याबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय, क्रमांक संकिर्ण-२०१६/प्र.क्र.७९६/ई,**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**
**दिनांक : २५ जानेवारी, २०१७.**

संदर्भ :- १) शासन निर्णय, विधी व न्याय विभाग, क्रमांक सीटीए-२०१६/प्र.क्र.९४/का.१९, दिनांक २७.०८.२०१४.
२) शासन निर्णय, विधी व न्याय विभाग, क्रमांक समिती-२०१६/प्र.क्र.०६/का.१९, दिनांक ०८.०२.२०१६.

प्रस्तावना :-

महाराष्ट्रातील न्यायव्यवस्थेचे बळकटीकरण करण्याकरिता संदर्भाधीन क्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्य विवाद धोरण लागू करण्यात आले आहे. राज्य विवाद धोरणाच्या परिच्छेद ३ मध्ये सदर धोरणाच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी राज्यस्तरीय, विभागस्तरीय व जिल्हास्तरीय अधिकार समिती गठीत करणे ही प्रमुख तरतूद असून त्यानुषंगाने संदर्भाधीन क्रमांक २ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्य विवाद धोरणानुसार राज्यस्तरीय, विभागस्तरीय व जिल्हास्तरीय अधिकार समिती गठीत करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. त्यास अनुसरुन विभागस्तरीय समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

राज्य विवाद धोरणान्वये अधोरेखित केलेली उद्दिष्टे साध्य करण्याकरिता, सामूहिक धोरणात्मक निर्णय घेऊन त्यांची प्रभावीपणे अंमलबजावणी करण्याकरिता या विभागाची विभागस्तरीय समिती खालीलप्रमाणे गठीत करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अधिकारी | पद |
|---|---|---|
| १ | अप्पर मुख्य सचिव (मदत व पुनर्वसन) | अध्यक्ष |
| २ | प्रधान सचिव (महसूल, मुद्रांक शुल्क व नोंदणी) | सदस्य |
| ३ | प्रधान सचिव (अ व री ) तथा विकाअ | सदस्य |
| ४ | सचिव (वने) | सदस्य |
| ५ | सह सचिव (विधी) (समन्वय अधिकारी) | सदस्य सचिव |

भविष्यात सदर समितीतील सेवाज्येष्ठ असणारे अधिकारी अध्यक्ष म्हणून काम पाहतील.

विभागस्तरीय समितीची कर्तव्ये :-

राज्य विवाद धोरणातील परिच्छेद ३.२.२ मध्ये विहीत केल्याप्रमाणे सदर विभागस्तरीय समितीची कर्तव्ये पुढीलप्रमाणे असतील :-

१) विभागीय स्तरावरील अधिकार प्रदत्त समिती सर्व प्रकरणांची जी सूची तयार करील, तिचा विषय, प्रदेश, क्षेत्र, गट, कर्मचा-यांचा प्रवर्ग, विवादाचा प्रकार, विवादाचा कालावधी, मागासवर्ग, महिला, बालक, धोरणे व तत्सम इत्यादी यांच्या आधारे वर्गवारी करणे, विभागाने किंवा त्यांच्या विरोधात दाखल करण्यात आलेल्या सर्व विवादांचे संनियंत्रण करणे आणि कोणत्याही प्रस्तावित उपाययोजना किंवा कोणतीही कारवाई करण्यासाठी राज्यस्तरावरील अधिकार प्रदत्त समितीला सूचना किंवा शिफारशी करणे. दहा वर्षे, पाच वर्षे व तीन वर्षापेक्षा अधिक जुन्या प्रकरणांचे व ती प्रकरणे प्रलंबित राहण्यामागची कारणे यांचे सखोलपणे संनियंत्रण करणे, समिती विभागाच्या मध्यस्थ अधिकारी ( नोडल ऑफिसर ) यांना प्रकरणांचा लवकरात लवकर निर्णय लावण्यासाठी किंवा ती निकालात काढण्यासाठी निर्देश देणे.

२) ज्यामध्ये न्यायालयाने सामाईक त्रुटी, दोष, विसंगती किंवा चुका दर्शवून देणारे निदेश/ न्यायनिर्णय/ आदेश दिले आहेत असे भविष्यातील एक सारखेच विवाद टाळण्यासाठी अशा प्रकरणांचा त्रैमासिक आढावा घेणे. अशा प्रकरणांचा त्रैमासिक आढावा घेतल्यानंतर त्याचा अहवाल राज्यस्तरीय अधिकार प्रदत्त समितीला सादर करणे. अपिल/ आवेदन/ प्रतिक्रिया/ लेखी निवेदन दाखल करण्यासाठी आणि न्यायालयाच्या आदेशांच्या अंमलबजावणीसाठी यथोचित यंत्रणेची योजना करणे.

३) कोणतीही कार्यवाही, परिच्छेदनिहाय अभिप्राय उत्तरादाखलचे प्रतिज्ञापत्र, अपिलासाठीचे प्रस्ताव सादर/ दाखल करण्यात होणारा विलंब/ कसूर आदेशाच्या अंमलबजावणीतील निष्क्रियता/ हलगर्जीपणा किंवा आदेशाची अंमलबजावणी न करण्यामागची कारणे, योग्य किंवा पूर्ण सूचना देण्याबाबत केलेली चूक, आवश्यक ते सर्व कागदपत्रे पुरविण्यास आलेले अपयश, प्रकरणांचा मागोवा घेण्यात मध्यस्थ अधिका-यास आलेले अपयश, इत्यादींची चौकशी करणे. राज्य सरकारला नुकसान झाले आहे असे जर समितीच्या निदर्शनास आले तर ती कारणांसहित आपल्या लेखी अहवालाद्वारे राज्यस्तरीय अधिकार प्रदत्त समितीस कोणत्याही कारवाईची शिफारस करणे.

४) राज्यस्तरीय अधिकार प्रदत्त समितीस प्रकरणांची चौकशी, निकाल आणि प्रलंबित प्रकरणे यांचा मासिक अहवाल सादर करणे. दहा वर्षे, पाच वर्षे आणि तीन वर्षापेक्षा जास्त जुन्या असणा-या प्रकरणांचा स्वतंत्र मासिक प्रगती अहवाल सादर करणे. जुन्या प्रकरणांचा सातत्याने पाठपुरावा करणे, संबंधित विभागास प्रकरणे लवकरात लवकर निकालात काढण्यासाठी शिफारशी किंवा सूचना देणे.

५) चारमाही तत्वावर मुदतबाह्य, निष्फळ किंवा असफल प्रकरणांची यादी राज्यस्तरीय अधिकार प्रदत्त समितीस सादर करणे. त्याचप्रमाणे अधिकार प्रदत्त समिती उच्च न्यायालयाच्या किंवा सर्वोच्च न्यायालयाच्या कोणत्याही पूर्व न्यायनिवाड्यांतर्गत ( आव्हान न दिलेल्या ) सामावून घेतलेल्या प्रकरणांची सूची देणे. अशा उक्त न्यायनिवाड्यांतर्गत किंवा आदेशांतर्गत सामावून घेतलेल्या प्रकरणांच्या सूचीसाठी तडजोडीची शिफारस करणे.

६) राज्य सरकारला झालेल्या अदमासे नुकसानीचा अंदाज आणि त्या विषयाशी संबंधित सविस्तर माहिती, दस्तऐवज, शे-यांसह सरकारी वकिलाविरुध्द तक्रारी/ गा-हाणी राज्यस्तरीय अधिकार प्रदत्त समितीकडे पाठविणे.

७) कोणत्याही लवादाच्या नियुक्तीच्या पूर्वी समिती राज्यस्तरीय अधिकार प्रदत्त समितीकडे अशा शिफारशी मंजूरीसाठी पाठविणे.

८) राज्यस्तरीय अधिकार प्रदत्त समितीने दिलेल्या निदेशांची, शिफारशींची किंवा सूचनांची अंमलबजावणी करणे.

९) सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०१२५१५१४२२१९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

K. P. Wadte

Digitally signed by K. P. Wadte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=092f3d18dd73e55dfcdc33acd72708a0290e9758bc4e1500205b182e2d843c82, cn=K. P. Wadte
Date: 2017.02.03 15:25:41 +05'30'

**( कि.पां.वडते)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, महाराष्ट्र राज्य.
२. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, महाराष्ट्र राज्य.
३. सर्व मंत्री/ राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक, महाराष्ट्र राज्य.
४. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य.
५. सर्व अ.मु.स./ प्र.स./सचिव, मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०००३२.
६. अपर मुख्य सचिव (मदत व पुनर्वसन) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई -४०००३२.
७. प्रधान सचिव (महसूल) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई -४०००३२.
८. प्रधान सचिव व वि.का.अ.(अ.व री.) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई -४०००३२.
९. सचिव (वने) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
१०. सचिव व विधी परामर्शी, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
११. सहसचिव (विधी) (समन्वय अधिकारी), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
१२. सर्व सह सचिव/ उप सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२.
१३. सर्व अवर सचिव/ कक्ष अधिकारी, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२.
१४. ई शाखा ( निवडनस्ती ), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२.